महाराष्ट्र कोषागार नियम,१९६८ मधील नियम ४९५ अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदीमधून महसूल व वन विभागाच्या अधिनस्त उप विभागीय अधिकारी आणि विशेष भूसंपादन अधिकारी यांच्या नांवे असलेली वैयक्तिक ठेव लेखा खाती (P.L.A.) वगळण्याबाबत......

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०२२/प्र.क्र.८४/कोषा-प्रशा५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १९ जून, २०२३

**संदर्भ** : वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण १०१४/प्र.क्र.५/कोषा प्रशा ५ दि. २४ जानेवारी, २०१४.

**प्रस्तावना** :

महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम ४९५ अन्वये एक पूर्ण लेखा वर्षापेक्षा अधिक कालावधीपर्यत ज्या वैयक्तिक ठेव लेखा खाते (P. L. A.) मध्ये कोणताही व्यवहार झालेला नसेल अशी वैयक्तिक ठेव लेखा खाती बंद करण्यात यावी आणि प्रत्येक वर्षी मार्च अखेर ज्या रकमा अशा खात्यांमध्ये शिल्लक राहतील त्या शासनाकडे जमा करण्यात याव्यात; अशी तरतूद आहे.

२. विविध प्रकल्पांकरीता जमिन अधिग्रहण करताना जमिन धारकांना भुसंपादनाचा मोबदला वितरीत करण्याच्या प्रयोजनासाठी उप विभागीय अधिकारी आणि विशेष भुसंपादन अधिकारी यांच्या नांवे वैयक्तिक ठेव लेखा खाती निर्माण करण्यात आली आहेत . तथापि, काही प्रकरणी वाद उत्पन्न झाल्यास अशी प्रकरणे न्यायप्रविष्ठ झाल्याने भूमिसंपादन लाभाची रक्कम जमिन मालकांना त्वरित वितरीत केली जात नाही. अशा रकमा न्यायालयीन आदेश होईपर्यंत सदर वैयक्तिक ठेव लेखा खात्यातच जमा राहतात. न्यायालयाच्या आदेशानंतर विहित कालावधीमध्ये न्यायनिर्णयानुसार सदर रकमांचे वाटप भूमी मालकांना करणे अभिप्रेत आहे. तथापि, महाराष्ट्र कोषागार नियम क्र. ४९५ मधील उपरोक्त तरतूदी अन्वये एक पूर्ण लेखा वर्षापर्यंत व्यवहार न झालेली वैयक्तिक ठेव लेखा खाती बंद करणे अनिवार्य करण्यात आले आहे. परिणामी न्यायालयाच्या आदेशानंतर विहित कालावधीत भुसंपादनाच्या रकमांचे वाटप जमिन मालकांना करता येत नाही. अशा वेळी पुढील आर्थिक वर्षात पुन्हा अर्थसंकल्पीय तरतूद करुन कोषागारातून रकमा आहरीत करुन , वैयक्तिक ठेव लेखा खाते पुनरुज्जीवीत करुन त्यामध्ये जमा कराव्या लागतात. या प्रक्रियेमध्ये कालापव्यय होतो. न्यायालयाच्या आदेशाचे पालन न झाल्याने अनेकदा शासकीय मालमत्तेवर जप्तीची कार्यवाही होण्याची नामुष्की ओढावते. सदर अडचणींवर उपाययोजना करण्याकरिता उप विभागीय अधिकारी , तसेच विशेष भुसंपादन अधिकारी यांच्या नांवे असलेल्या वैयक्तिक ठेव लेखा खात्यांना महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्र. ४९५ अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदींमधून सूट देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

(१) विविध प्रकल्पांकरीता जमिन अधिग्रहण करताना जमिन धारकांना भुसंपादनाचा मोबदला वितरीत करण्याच्या प्रयोजनासाठी महसूल व वन विभागाकडील उप विभागीय अधिकारी तसेच विशेष भूसंपादन अधिकारी यांच्या नांवे असलेल्या वैयक्तिक ठेव लेखा खात्यांना महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम ४९५ अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदींमधून वगळण्यात येत आहे.

(२) अशी वैयक्तिक ठेव लेखा खाते आता भुसंपादन मोबदल्याच्या रकमा सर्व जमीन मालकांना वितरीत होईपर्यंत चालू राहतील.

(३) तथापि अशा वैयक्तिक ठेव लेखा खात्याचे प्रयोजन संपुष्टात आल्यास, प्रचलित विहित कार्यपध्दतीस अनुसरुन असे वैयक्तिक ठेव लेखा खाते बंद करणे अनिवार्य राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०६२०११५५२६६७०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR RAJENDRA
UTTAMRAO GADEKAR

Digitally signed by DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=b8e8c3a034acb70f16af6f81c69ca038ff6f25ff78cfc9e6d815fd95b5367b07, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=37A42E182BACE4C129ABBEB54E27836D32D401560638F644A547867205474EE5, cn=DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
Date: 2023.06.20 11:57:08 +05'30'

**( डॉ. राजेंद्र गाडेकर )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
६. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
८. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
९. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
१०.प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
११.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१२.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१४.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१५.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन*, नागपूर ४४४००१

१६.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१८. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१९.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२०.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२१.मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२२.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२३.सर्व विभागीय आयुक्त
२४.सर्व जिल्हाधिकारी
२५.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२६.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२७.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२८. सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर
२९.संचालक, स्थानिक निधी लेखापरिक्षा संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई
३०.सहसंचालक,स्थानिक निधी लेखा परिक्षा कोकण/पुणे/नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर
३१.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
३२.वित्त विभागातील सर्व कार्यासने
३३.निवड नस्ती कोषा प्र.५.